राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी सर्वसाधरण घटकाखालील (राज्य हिश्श्याचे) अनुदान वितरीत करण्याबाबत (लेखाशिर्ष २२१५-२०७१)

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः जेजेएम २०१९/ प्र.क्र.१५९ /पापु-१०**

७ वा मजला, गोकुलदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: १९ मार्च, २०२०

**वाचा -**

१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ (अ)/ पापु-०७, दि.१७.०३.२०१०
२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/ पापु-०७, दि.०९.०७.२०१४
३) वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.०८.०७.२०१९

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (जल जीवन मिशन) हा केंद्र पुरस्कृत कार्यक्रम राज्यात राबविण्यात येत आहे. सन २०१९- २० या आर्थिक वर्षात मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२), जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (१५) नळाव्दारे पाणी पुरवठा योजना- राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यकम यासाठी अनुदान (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (२२१५ २०७१) या लेखाशीर्षाखाली अंमलबजावणी यंत्रणांना निधी वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

**शासन निर्णय-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणाऱ्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीकरिता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास रु. ६,६०,१७,१००/- ( रु.सहा

कोटी साठ लाख सतरा हजार शंभर फक्त) इतके अनुदान कव्हरेज या घटकासाठी अर्थसंकल्प प्रणालीव्दारे (BEAMS) पुढील अटींच्या अधिन राहून मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

१) अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निश्चित वार्षिक कृती आराखड्यात समाविष्ट असलेल्या कव्हरेज गावे/ वाडयांमधील प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या गावे/ वाडयांमधील योजनांची कामे तसेच ज्या केंद्रीय सहाय्यित योजनांमध्ये शासन सहभाग सक्तीचा करण्यात आलेला आहे, अशा प्रगतीपथावरील योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करावा.
२) सदर निधी सन २०१९-२० या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे. याची कृपया दक्षता घेण्यात यावी. खर्चाची जबाबदारी संबंधित यंत्रणांची राहील.
३) अंमलबजावणी यंत्रणानी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.
४) या शासन निर्णयातील अटी व शर्तीची व राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (जल जीवन मिशन) या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अमंलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करून घेता यावी यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास लेखा परिक्षणाकरीता संबंधित अमंलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य रितीने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.
५) ग्राम विकास विभागाच्या शासन परिपत्रक क्र. आरसीएन-१०८९/ सीआर-३०२७/२८, दि.०५.०९.१९९० मधील सुचनेप्रमाणे या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहीत दिनांकाना महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी विभागीय आयुक्त (विकास शाखा) यांना व या विभागातील कार्यासन पापु-०५ व पापु-२० ला सादर करावे.
६) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या (जल जीवन मिशन मार्गदर्शक सूचनांनुसार सर्वसाधारण या घटकाखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५० टक्के केंद्र निधीतून व ५० टक्के राज्य निधीतून करणे आवश्यक आहे. या मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास सादर करावीत.

७) केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता IMIS या योजना प्रणालीवर पुढीलप्रमाणे घेण्यात यावी तसेच सदर नोंदी वेळोवेळी अद्यावत करण्यात याव्यात.

क. भौतिकदृष्टया १०० पुर्ण परंतु आार्थिकदृष्टया अपूर्ण योजना

ख. >७५ ते >१०० भौतिकदृष्टया पुर्ण

ग. > ५० ते >७५ भौतिकदृष्टया पूर्ण

घ. > २५ ते >५० भौतिकदृष्टया पूर्ण

८) सर्वसाधारण या घटकांतर्गत उपलब्ध करून दिलेला निधी सन २०१९-२०२० च्या वार्षिक कृती आराखडयात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा.

९) सदर रक्कम कोषागारातून त्वरीत आहरीत करण्यात यावी व त्यानंतर जल जीवन मिशन अंतर्गत उघडण्यात आलेल्या सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीमध्ये (PFMS) जमा करण्यात यावी.

२. सदर शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला रु.६,६०,१७,१००/- कोटी (रुपये सहा कोटी साठ लाख सतरा हजार शंभर फक्त) एवढा निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी संचालक (वित्त) (श्री.यशवंत बाबुराव पाटील) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तसेच सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (डॉ.नरेश गिते) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त) (श्री.यशवंत बाबुराव पाटील) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (डॉ.नरेश गिते) यांनी प्रति स्वाक्षरित केलेले देयक अधिदान व लेखाधिकारी, कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. सदर रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीव्दारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या जल जीवन मिशनच्या खात्यात जमा करण्यात यावी.

३. सदर निधी कोषागारातून तात्काळ आहरित करण्यात यावी. कोषागारातून रक्कम वेळीच न काढली गेल्यास तसेच सदर रक्कम या शासन निर्णयात नमूद केलेल्या प्रयोजनांसाठी न वापरण्यात आल्यास त्याबाबतची संपुर्ण जबाबदारी संबंधितांची राहील.

४ यावर होणारा खर्च सन २०१९- २० या आर्थिक वर्षात मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम,

(०२), जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (१५) नळाव्दारे पाणी पुरवठा योजना-राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यकम यासाठी अनुदान (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (२२१५ २०७१) या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.०८.०७.२०१९ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकामधील तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १ ते ९ व क्र. ९ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१८१४५६०८८२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB BABASAHEB HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, street=WATER SUPPY AND SANITATION DEPARTMENT,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=0edd9c3872935c071332e1f94cbcdc9828471b3251eee2d5c23fd681ec41cefa, ou=WATER SUPPY AND SANITATION DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2020.03.19 12:39:54 +05'30'

**( बाळासाहेब हजारे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. सह सचिव (पापु-१०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई

प्रत,

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
३. महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महारष्ट्र-१-मुंबई/२- नागपुर,
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. नियोजन विभाग(कार्यासन १४४३)/ वित्त विभाग(व्यय-३), मंत्रालय, मुंबई.

६. विभागीय आयुक्त, पुणे.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
१०. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई,
११. पापु-०५/२० पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. निवडनस्ती पापु-१०.